**राष्ट्रीय फलोत्पादन अभियांनातंर्गत सन २००९-१० मध्ये राज्य हिश्श्याचा १५ टक्के निधी वितरीत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**कृषि, पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,**
**शासन निर्णय क्र राफअ २००९/प्र.क्र. १४१/९अे,**
**मंत्रालय, मुंबई-४०० ०३२,**
**दिनांक ९ सप्टेंबर, २००९**

**वाचा :-** १) केंद्र शासनाचे अ.शा. पत्र क्रमांक ३३-३० /२००९ हॉर्ट, दि. ९ जून, २००९
२) केंद्र शासनाचे अ.शा. पत्र क्रमांक १८-१०/२००९/एनएचएम, दि. १७ जून,२००९
३) महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांचे पत्र क्रमांक मराफवऔवमं/सप्रव्य/राहि १५%रा.हि./ २६६९/०९८, दि. ६ जुलै,२००९.
४) वित्त विभाग शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण -१००६/प्र.क्र.१३१/कोषा.प्रशासन-५ दि. १५/५/२००७.
५) कृषि व पदुम विभाग शासन निर्णय क्रमांक -पुरक क्र.१००९/(प्र.क्र.७६/०९)/२-अे दि.६ जुलै, २००९.

**प्रस्तावना**

राज्यात सन २००५-०६ या आर्थिक वर्षापासून केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यात येत आहे. केंद्र शासनाने सन २००५-०६ व २००६-०७ मध्ये राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी १०० टक्के निधी उपलब्ध करुन दिला होता. मात्र ११ व्या पंचवार्षिक योजनेत सन २००७-०८ या आर्थिक वर्षापासून राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्यासाठी केंद्र शासनाचा ८५ टक्के हिस्सा व राज्य शासनाचा १५ टक्के हिस्सा याप्रमाणे सदर कार्यक्रम राबविण्यात येत आहे.

**२.** सन २००९-१० मध्ये केंद्र शासनाने राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राज्यात राबविण्यासाठी एकूण रु.१६३४९.२० लाख रक्कमेच्या कृती आराखडयास मान्यता दिलेली आहे. सदर अभियानासाठी केंद्र शासनाचा ८५% हिस्सा रु. १३८९६.८२ लाख व राज्य शासनाचा १५% हिस्सा रु.२४५२.३८ लाख इतका आहे. सन २००९-१० या आर्थिक वर्षात राष्ट्रीय फलोत्पादन अभियान अंतर्गत १५% राज्य हिश्श्यापोटी रु.३६५०.०० लाख एवढी अर्थसंकल्पिय तरतूद उपलब्ध आहे.

**३.** राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत सन २००९-१० मध्ये केंद्रिय हिश्श्यापोटी केंद्र शासनाने त्यांचे संदर्भाधीन पत्र क्र.२ अन्वये रु.८१७३.२० लाख निधी उपलब्ध करुन दिलेला असून तो महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ,पुणे यांच्याकडे जमा आहे. सदर निधी ८५% आहे हे गृहित धरुन त्या अपरोक्ष सन २००९-१० या आर्थिक वर्षात राज्य शासनाच्या १५% हिश्श्यापोटी रु.१४४२.३३ लाख इतका निधी वितरित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय**

सन २००९-१० मध्ये राष्ट्रीय फलोत्पादन अभियानांतर्गत केंद्र शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या रु.८१७३.२० लाख इतक्या निधीच्या अपरोक्ष राज्य हिश्श्यापोटी रु. १४४२.३३ लाख (रुपये चौदा कोटी बेचाळीस लाख तेहतीस हजार फक्त ) निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

**२.** राष्ट्रीय फलोत्पादन अभियान राबविण्याकरिता राज्य शासनाच्या १५ % हिश्श्याचे रु. १४४२.३३ लाख (रुपये चौदा कोटी बेचाळीस लाख तेहतीस हजार फक्त ) खालील मंजूर लेखाशीर्षातील सन २००९-२०१० च्या तरतूदींतून उपलब्ध करुन देण्यास मान्यता देण्यात येत आहे.

मागणी क्रमांक डी - ३
२४०१ - पीक संवर्धन,
११९ - बागायती व भाजीपाला पिके,
११९ - (०३) रोपमळे
(०३ ) (३४ ) राष्ट्रीय फलोत्पादन अभियांन (राज्य योजना) (२४०१ ४५०७)

३३- अर्थसहाय्य

**४.** या योजनेसाठी मंजूर केलेला निधी खर्च करण्यास व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे यांच्याकडे एक रकमी सुपूर्द करण्यासाठी **सहाय्यक संचालक लेखा, कृषि आयुक्तालय, पुणे यांना आहरण व संवितरण अधिकारी** म्हणून घोषित करण्यात येत आहे.

**५.** वरील प्रमाणे मंजूर केलेला निधी अर्थसंकल्पिय तरतुदीच्या मर्यादेत व मासिक निधी विवरण पत्राप्रमाणे वित्त विभागाने विकसीत केलेल्या " संगणकीय अर्थसंकल्प विवरण प्रणाली " मध्ये शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून वित्त विभागाच्या संदर्भ क्रमांक ४ व कृषी व पदुम विभागाच्या संदर्भ क्र. ५ येथील शासन निर्णयाचे काटेकोरपणे अमंलबजावणी होईल यांची दक्षता आहरण व संवितरण अधिकारी यांनी घ्यावी.

**६.** सदर शासन निर्णय नियोजन विभाग व वित्त विभाग यांच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक अनुक्रमे १६०७/१४३१, दिनांक २० ऑगस्ट,२००९ व १२३४ /व्यय-१ , दि. ९ सप्टेंबर ,२००९ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

**७.** सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेताक ( २००९०१०१४००३९००१ ) असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(स.ह. भोसले )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव
मा. मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
प्रधान सचिव, विधान मंडळ सचिवालय, मुंबई
आयुक्त कृषी, महाराष्ट्र राज्य,पुणे.
सर्व जिल्हाधिकारी,(मुंबई व मुंबई उपनगर वगळून)
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी जिल्हा परिषद
संचालक फलोत्पादन, कृषी आयुक्तालय,महाराष्ट्र राज्य,पुणे, (१० प्रती)

व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य फलोत्पादन आणि औषधी वनस्पती मंडळ, पुणे
सर्व संचालक/ सर्व सहसंचालक कृषी आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य,पुणे,
सर्व विभागीय कृषी सहसंचालक,
सर्व जिल्हा अधिक्षक कृषी अधिकारी,
सहाय्यक संचालक (लेखा) कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे ( १० प्रती )
महालेखापाल-१/२ (लेखा व अनुज्ञेयता ) (लेखा परीक्षा ) मुंबई /नागपूर,
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी
संचालक लेखा व कोषागारे, मुंबई ( २ प्रती)
सहसंचालक लेखा व कोषागारे संगणक कक्ष, नवीन प्रशासन भवन, ५वा मजला, मुंबई -३२,
सर्व विधानसभा/विधानपरिषद सदस्य
माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई-३२.
नियोजन विभाग,(कार्यासन -१४३२ ) मंत्रालय,मुंबई. /वित्त विभाग (व्यय-१ ) अर्थसंकल्प -३,१२,
सह सचिव/सर्व उपसचिव/अवर सचिव/कक्ष अधिकारी, कृषी व फलो. विभाग,मंत्रालय,मुंबई
निवड नस्ती